

जय गजानन ४१

श्रीगृत्समद प्रल्हादास पुढे सांगू लागले. 'श्रीहरी विष्णूंसह श्रीशंकर समस्त देवतांना घेऊन रणांगणावर आले. तारकासुराच्या आक्रांताला थांबविण्यास आलेल्या त्या सदाशिवांना पाहून तारकासुर म्हणाला, अरे शिवा! तू कशासाठी या रणभूमीवर आलास? अरे, सिंहासोबत कधी ससा लढाई करू शकेल कां? अरे मदासुर तर खूप दूरची गोष्ट झाली. मी त्याचा सेवकच तुझा वध करील.

तारकासुर वचनांने क्रोधित श्रीशंकरांनी आपला प्रलयंकारी त्रिशूळ फेकला आणि भग्नवृक्ष कोसळावा तसा तारकासुर धरणीवर आदळला. श्रीहरींनी सुदर्शन चक्राचा प्रयोग केला आणि अगणिक सैन्य कापले जाऊ लागले. दैत्य रणांगण सोडून प्राण वाचविण्यासाठी पलायन करू लागले. देवतांचा तो पराक्रम पाहून मग बाणासूर, त्रिपुरासुर, शंखासुर आदी समस्त राक्षस सेनानी आपल्या रणनीतीला सांभाळते झाले. त्यांनी आपले भयानक शंख वाजवून आसमंत दणाणून टाकले. वर्षाकाळात पर्जन्याच्या धारा पडाव्यात तशा शस्त्रास्त्रांच्या धारा सोडत हल्ला आरंभिला. भीषण युद्धास आरंभ झाला.

बाणासुराने सूर्यास, शंखासुराने विष्णूस तर त्रिपुरासुराने ललकारी देत श्रीशंकरांना आव्हान दिले. पुनश्च भीषण संग्राम सुरू झाला. दैत्यसेनेने देवतांवर वृक्ष, पर्वतांचा मारा केला. तीन दिवसपर्यंत अविश्रान्त रणकंदन सुरू होते. शेवटी श्रीशंकरांनी त्रिशूलाने त्रिपुरासुरास पाडले. सूर्याने आपल्या अतिप्रचंड ज्वालांनी बाणासुराला जाळले तर श्रीहरींनी शंखासुरास सुदर्शनाने विद्ध केले. देवसैन्याने त्या तिघांना बांधून एका भयानक विवरात फेकून दिले. उर्वरित दैत्य सैन्य शरण आले आणि श्रीशंकरांच्या प्रमुखत्वाखाली देवसेनेने विजयोत्सव साजरा केला.

मात्र हा वृत्तांत समजताच डोळ्यात रक्त जमा झालेला मदासुर आपल्या तीन पुत्रांसह तथा दैत्यगुरू शुक्राचार्यांसमवेत स्वतःच रणांगणावर प्रस्थान करता झाला. आल्या आल्या धनप्रिय नामक पुत्राने त्रैलोक्य प्रकाशक सूर्यास बाणांनी विद्ध केले आणि म्हणाला- अरे दुष्टा! माझे हितकारक वचन ऐक. सरळ युद्धभूमीतून पलायन कर. अन्यथा विनाकारण मारला जाशील. पूर्वी तू अनेक दैत्य मारले आहेस. आता त्याचे फळ भोग. अरे काश्यपा! मला शरण ये. अन्यथा हे महादुष्टा, आता तुझे जगणे अशक्य आहे.'

त्यावेळी श्रीसहस्त्ररश्मींनी खड्ग मारून धनप्रियास मूर्च्छित केले; मात्र तात्काळ शुद्धीवर आलेल्या धनप्रियाने जो उलटवार केला, त्याने श्री सूर्य मूर्च्छित झाले. त्यांना पाशबद्ध करून धनप्रिय परतला. त्याने श्रीसूर्यास पित्यासमोर टाकले.

मदासुराचा द्वितीय पुत्र विलासी श्रीविष्णूंवर चालून गेला. त्याने आपल्या आघातांनी नारायणी सेनेची दाणादाण उडविली. त्यावेळी श्रीकेशव म्हणाले- माझ्या सैन्याची तू ही दैना केलीस त्यावेळी मी समोर नव्हतो. आता या शस्त्राघाताने मी तुझा वध करीन. असे म्हणत श्रीहरींनी आपले सुदर्शन सोडले. त्याने थोडा वेळ तर विलासीला मूर्च्छित केले. पण मग जी अवस्था सूर्यांची झाली तीच श्रीविष्णूंचीही झाली. राक्षसराजकुमाराच्या गदाघाताने मूर्च्छित विष्णूंना बांधून विलासीही पितृवंदन करण्यासाठी माघारी परतला.

लोलुप नामक तृतीय पुत्र श्रीवृषभध्वजांवर चाल करून गेला. त्यांना ललकारत तो म्हणाला- हे नीललोहिता, आत्तापर्यंत तू आमची अफाट सेना वधिलीस. आता त्याचे फळ भोग. मात्र त्याचे हे बरळणे अधिक वाढण्यापूर्वीच श्रीशंकरांनी आपल्या पाशुपतास्त्ररूपी परशूने त्यास लोळविले. मात्र शुक्राचार्यांनी आपल्या मृतसंजीवनी विद्येच्या प्रभावाने लोलुपास जीवदान दिले. पुनश्च युद्धसज्ज झालेल्या लोलुपाने मायावी युद्धास आरंभ केला. अकस्मात सर्वत्र भयानक अग्नी प्रगट झाला. तो सर्वांना जाळू लागला. सर्वप्रथम त्या अग्नीने सगळ्यांची वस्त्रे जाळली. समस्त देवसेना नग्नतारूपी अजबच संकटास सामोरी गेली. श्रीशंकरही या विचित्र प्रकाराने दिङ्मुख झाले. मायामोहित झाले. अशा भ्रमित शंकरांना बाधून लोलुप पित्याला वंदन करण्यासाठी गेला.

इकडे तीनही देवता बंदिस्त झाल्या म्हटल्यावर अतिभयभीत देव सैन्य आदिशक्तीला शरण गेले. असुरनगरीत मात्र महान आनंदोत्सव साजरा होऊ लागला.

***